**सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्रमांक-एक्स-१ मुख्य लेखाशिर्ष " २२३६ पोषण आहार" या लेखाशिर्षाअंतर्गत वितरित करावयाच्या निधीबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: मबाआ-२०१८/प्र.क्र.७१/का-७अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २२ जून, २०१८.

**संदर्भ**:- १) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि. २ एप्रिल, २०१८.
२) शासन परिपत्रक,महिला व बाल विकास विभाग क्र. बीजीटी- २०१८/प्र.क्र. ३३/का-४, दि. ५ एप्रिल, २०१८
३) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे पत्र क्र. एबाविसेयो/का-३/वेतन तरतुद/१८४८/१७-१८, दि. १६.५.२०१८.

**प्रस्तावना:**

महिला व बाल विकास विभागामार्फत एकात्मिक बाल विकास सेवा योजना ही केंद्र पुरस्कृत योजना आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना , नवी मुंबई या कार्यालयाकडून राबविण्यात येते. सन २०१८-१९ मध्ये योजनानिहाय/लेखाशिर्षनिहाय अर्थसंकल्पित निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक २ एप्रिल, २०१८ च्या परिपत्रकान्वये मंजूरी दिली आहे. एकात्मिक बाल विकास सेवा योजना,ही केंद्र पुरस्कत योजना असल्याने त्याकरिता केंद्राचा निधी प्रत्यक्ष राज्य शासनास प्राप्त झाल्यानंतर त्याप्रमाणात निधी वितरीत करण्याबाबतच्या सूचना वित्त विभागाने दिलेल्या आहेत. केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला निधी तसेच एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी निधी वितरणाचा दिलेला घटकनिहाय तपशील विचारात घेवून महिला व बाल विकास विभागांतर्गत मुख्य लेखाशिर्ष २२३६- पोषण आहार अंतर्गत अनुज्ञेय होणारा निधी वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्रमांक-एक्स-१ मुख्य लेखाशिर्ष २२३६-पोषण आहार अंतर्गत २२३६ १९०९ व २२३६ १९१८ या लेखाशिर्षाखाली संबंधित उद्दीष्टाखाली अर्थसंकल्पित केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णयासोबतच्या विवरणपत्रामधील स्तंभ क्र-५ मध्ये नमूद केल्यानुसार अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर निधी वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. त्यानुसार आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक-१ येथील दिनांक २.४.२०१८ च्या परिपत्रकामध्ये नमूद केलेल्या तपासणी सूचीतील

बाबींची तसेच यासंदर्भात नियोजन विभाग व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.

३. याबाबत सन २०१८-१९ करीता वरील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला निधी खर्च होईल व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

४. सदर निधी केद्र शासनाकडून मंजूर APIP च्या प्रमाणात घटकनिहाय खर्च करण्याची दक्षता आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी घ्यावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक २.४.२०१८ च्या परिपत्रकामधील तरतुदीच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१८०६२११५१२३५४१३० असा आहे. सदरचा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.07.04 13:09:01 +05'30'

**( ला.रा.गुजर )**
**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई
२) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे
३) महालेखापाल १/२, ( लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर
५) सर्व महिला व बाल विकास अधिकारी, जिल्हा परिषद (आयुक्तालय, नवी मुंबई मार्फत)
६) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (आयुक्तालय, नवी मुंबई मार्फत)
७) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी(आयुक्तालय, नवी मुंबई मार्फत)
८) कार्यासन(व्यय-६/अर्थसंकल्प-७) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
९) कक्ष अधिकारी(का.४/६), महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१०) निवड नस्ती-का-७ अ

## शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२०१८/प्र.क्र.७१/का-७ अ, दिनांक २२ जून, २०१८ सोबतचे विवरणपत्र

| अ.क्र. | योजनेचे नांव | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पित निधी (रु. हजारात) | वितरीत करावयाचा अनुज्ञेय निधी (रु. हजारात) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | | २२३६- पोषण आहार | | |
| १ | (०८) (०१) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च ) (केंद्र हिस्सा ६० %) | २२३६ १९०९ | | |
| | ०३- अतिकालीक भत्ता | | १३५.०० | १३५.०० |
| | ०६- दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | | ३३३६.०० | ३३३६.०० |
| | १३-कार्यालयीन खर्च | | ३९३६.०० | ३९३६.०० |
| | १७-संगणक खर्च | | १०५०.०० | १०५०.०० |
| | २४-पेट्रोल, तेल व वंगण | | ८९४.०० | ८९४.०० |
| २ | **(०८)(०१) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (सर्वसाधारण खर्च ) (राज्य हिस्सा ४० %)** | २२३६ १९१८ | | |
| | ०३- अतिकालीक भत्ता | | ९०.०० | ९०.०० |
| | ०६- दूरध्वनी, वीज व पाणी शुल्क | | २२२४.०० | २२२४.०० |
| | १३-कार्यालयीन खर्च | | २६२४.०० | २६२४.०० |
| | १७-संगणक खर्च | | ७००.०० | ७००.०० |
| | २४-पेट्रोल, तेल व वंगण | | ५९६.०० | ५९६.०० |

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.07.04 13:09:19 +05'30'

( ला.रा.गुजर )
सह सचिव,महाराष्ट्र शासन